**कै. श्री. तुषार प्रकाश यादव, कनिष्ठ अभियंता यांना व्यावसायिक परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. मुविनि-२०१८/प्र.क्र.८५/ऊर्जा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २० जून, २०१८.

वाचा: १) मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई आदेश क्र. २१, दि. ३/०२/२००५
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: स्थापप्र-१४१५/(प्र.क्र.१४/१५)/१३-अ, दि.१९/०९/२०१७.
३) मुख्य विद्युत निरीक्षक यांचे पत्र क्र. मुविनि/कार्या-२/१६३०/२०१७-१८, दि.२६/१०/२०१७ व पत्र क्र. मुविनि/का-२/मु.लि./३५६/२०१८, दि. २८/०२/२०१८.

**प्रस्तावना:**

कै. श्री. तुषार प्रकाश यादव, कनिष्ठ अभियंता, यांची मुख्य अभियंता (वि.), सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या आदेश क्र. २१, दि. ३/०२/२००५ अन्वये विद्युत निरीक्षक, मिरज या कार्यालयात कनिष्ठ (विद्युत) गट-ब (अराजपत्रित) या पदावर नेमणूक करण्यात आली. त्यास अनुसरुन ते दि. १८/०२/२००५ रोजी शासन सेवेत रुजू झाले. श्री. यादव यांच्या नियुक्ती आदेशामध्ये नमूद अटीनुसार त्यांनी मराठी, हिंदी व व्यावसायिक परिक्षा विहित कालावधीत उत्तीर्ण होणे बंधनकारक होते. श्री. यादव यांना मराठी व हिंदी परिक्षा उत्तीर्ण होण्यापासून अधिक्षक अभियंता (विद्युत) पुणे प्रादेशिक विद्युत मंडळ, पुणे यांच्या कार्यालयीन आदेश क्र. ५६०, दि. १९/११/२००५ अन्वये सूट देण्यात आली आहे. परंतु, त्यांनी व्यावसायिक परीक्षा देण्याच्या एकाच संधीचा लाभ घेतला असून त्यामध्ये ते उत्तीर्ण झाले नाहीत. कै. श्री. तुषार प्रकाश यादव, कनिष्ठ अभियंता यांनी विहित कालावधीत व्यावसायिक परिक्षा उत्तीर्ण केली नसल्याने त्यांना स्थायित्व प्रमाणपत्र देण्यात आले नाही. त्यामुळे त्यांच्या मृत्यूनंतर स्थायित्व प्रमाणपत्राअभावी त्यांच्या कुटुंबास सेवानिवृत्ती नंतरचे अनुषंगिक लाभ अदा करण्यात आलेले नाहीत. उपरोक्त वाचा संदर्भ क्र.२ येथील दि. १९/०९/२०१७ रोजीच्या शासन परिपत्रकासोबतच्या परिशिष्ट अ मधील मुद्दा क्र. ३ नुसार एखादया अधिकारी कर्मचाऱ्याचे सेवेत असताना निधन झाले असेल व केवळ स्थायित्व लाभ प्रमाणपत्रा अभावी त्याच्या कुटुंबास सेवानिवृत्तीच्या अनुषंगिक लाभांपासून वंचित रहावे लागत असेल, तर अशा प्रकरणी स्थायित्व लाभ प्रमाणपत्रासाठी विहित केलेल्या अटी व शर्तीपैकी ज्या शर्तींची पूर्तता होत नसेल अशा शर्तींपासून त्याला सूट देण्याचा निर्णय संबंधीत प्रशासकीय विभागास घेता येईल अशी तरतूद आहे.

उपरोक्त तरतूदीस अनुसरून कै. श्री. तुषार प्रकाश यादव, कनिष्ठ अभियंता यांना व्यावसायिक परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

कै. तुषार प्रकाश यादव, कनिष्ठ अभियंता यांच्या कुटुंबास सेवानिवृत्तीच्या अनुषंगिक लाभांपासून वंचित रहावे लागू नये म्हणून उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील नियुक्ती आदेशामध्ये नमूद व्यावसायिक परिक्षा विहित

कालावधीत उत्तीर्ण होण्याच्या अटीमधून कै. तुषार प्रकाश यादव, कनिष्ठ अभियंता यांना एक विशेष बाब म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: स्थापप्र-१४१५/(प्र.क्र.१४/१५)/१३-अ, दि.१९/०९/२०१७. रोजीच्या शासन परिपत्रकासोबतच्या परिशिष्ट अ मधील मुद्दा क्र. ३ नुसार प्रशासकीय विभागास देण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२११५५८३१४२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकीत करून काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार नावाने,

Bhimashankar Yallappa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallappa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, cn=Bhimashankar Yallappa Manta
Date: 2018.06.21 15:57:43 +05'30'

**( भि. य. मंता )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३) मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव,
४) मा. राज्यमंत्री (ऊर्जा), मंत्रालय, मुंबई.
५) विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (ऊर्जा), मंत्रालय, मुंबई.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) /(लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई ४०० ०२०.
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) /(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११) मुख्य विद्युत निरीक्षक,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, तिसरा मजला प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पू) मुंबई-७१
१२) अधिक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, मुंबई.
१३) निवड नस्ती (ऊर्जा-५).